नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पासाठी महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) संवर्गातील अधिकाऱ्यांची नियुक्ती.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कृषिआ १०१८/प्र.क्र.१०८/१६अे**
मंत्रालय विस्तार इमारत,
मंत्रालय, मुंबई - ३२.
तारीख: २० ऑक्टोबर, २०१८

वाचा:-१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.हअप-०७१६/प्र.क्र.८०/राकृवियो कक्ष, दि.२८ सप्टेंबर, २०१७
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.हअप-०७१६/प्र.क्र.८२/राकृवियो कक्ष, दि.१७ जानेवारी, २०१८

**शासन आदेश :-**

नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाकरिता एकूण ८०५ पदांच्या आकृतीबंधास संदर्भाधीन शासन निर्णय दि.२८.०९.२०१७ अन्वये मान्यता दिलेली आहे. नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पास शासनाने संदर्भाधीन क्र.२ येथील दि.१७.०१.२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. प्रकल्पाची अंमलबजावणी क्षेत्रीय स्तरावर तात्काळ सुरु करावयाची असल्याने पदांची नितांत आवश्यकता असल्याने मंजूर पदे तात्काळ भरण्याची विनंती प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प यांनी केलेली आहे. शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) (दोन) व ४ (५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मंजुरीने महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांची पदस्थापना नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाकरिता त्यांच्या नावापुढे नमूद पदावर बदलीने करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव सर्वश्री | सध्याची पदस्थापना | पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्रीकांत वसंतराव अकोलकर, | मंडळ कृषि अधिकारी कापसी, ता. लोहा जि.नांदेड | प्रकल्प विशेषज्ञ, नांदेड |
| २ | सागर जंगलुजी डोंगरे, | मंडळ कृषि अधिकारी शिराळा, ता. पातूर जि. अकोला | प्रकल्प विशेषज्ञ, अकोला |
| ३ | नित्यानंद मुंजाजी काळे, | मंडळ कृषि अधिकारी देऊळगांव मही, ता. देऊळगांव राजा जि. बुलडाणा | प्रकल्प विशेषज्ञ, जालना |

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव सर्वश्री | सध्याची पदस्थापना | पदस्थापना |
|---|---|---|---|
| ४ | मिलिंदकुमार जिजाभाऊ अरगडे, | मंडळ कृषि अधिकारी शिरपुर, ता. मालेगाव जि. वाशिम | प्रकल्प विशेषज्ञ, वाशिम |
| ५ | सचिन विष्णुपंत पांचाळ, | कृषि अधिकारी, तालुका कृषि अधिकारी, माहुर जि. नांदेड | प्रकल्प विशेषज्ञ, उस्मानाबाद |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांनी बदलीने सुधारित पदस्थापना दिलेल्या कार्यालयात तात्काळ रुजू व्हावे व तसा अहवाल आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत शासनास सादर करावा.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८१०२०१६५२३५४९०१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, serialNumber=fc102de27dc1b41e747ac6cbb491c4209459c3cf340720ea98fd1d95b19c9f65, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2018.10.20 17:00:34 +05'30'

**( सु.सं.धपाटे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सचिव (कृषि) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) ½, महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
५. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई
६. उप सचिव (नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. संबंधित विभागीय कृषि सह संचालक/जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (व्दारा आयुक्त (कृषि), पुणे)
८. कृषि सह संचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (व्दारा आयुक्त (कृषि), पुणे)
१०. सर्व संबंधित अधिकारी (व्दारा आयुक्त (कृषि), पुणे)
११. निवड नस्ती /१६अे.